राज्यात विशेष मागास प्रवर्ग (अ) या प्रवर्गातील मुस्लिम समाजास जात प्रमाणपत्र व वैधता प्रमाणपत्र देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः सीबीसी-१०/२०१४/प्र.क्र. १४० / मावक**

मंत्रालय विस्तार भवन मुंबई -३२

दिनांकः २८ ऑगस्ट २०१४

**वाचाः- १) अल्पसंख्यांक विभाग शासन निर्णय क्र. अविवि-२०१४/प्र. क्र. ८१/का-७ दि. १९ जुलै २०१४**

# परिपत्रक

राज्यात शैक्षणिक व सामाजिक मागासलेल्या समाजासाठी विशेष मागास प्रवर्ग (अ) निर्माण करून त्यामध्ये शासन निर्णय क्र. अविवि-२०१४/प्र. क्र. ८१/का-७ दि. १९ जुलै २०१४ अन्वये सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागासलेल्या मुस्लिम गटाचा समावेश केलेला आहे.शासन सामाजिक न्याय विभाग निर्णय क्र. सीबीसी २०१४/प्र.क्र. १३१/मावक दि. २२ जुलै २०१४ अन्वये असे आदेश दिले आहेत की, सदर प्रवर्गामधील जातींना जात प्रमाणपत्रे व जात वैधता प्रमाणपत्रे देण्याची कार्यपध्दती, इतर मागासवर्गासाठी असलेल्या जात प्रमाणपत्रे व जात वैधता प्रमाणपत्रे देण्याच्या कार्यपध्दतीसारखीच राहील. या प्रवर्गासाठी जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्रासाठी इतर मागासवर्ग, विशेष मागास प्रवर्ग आणि शैक्षणिक व सामाजिकदृष्ट्या मागास प्रवर्ग या प्रवर्गाप्रमाणे महाराष्ट्रातील वास्तव्याचा दिनांक १३ ऑक्टोंबर १९६७ असा राहील.

तथापि या प्रवर्गातील व्यक्तींना जात प्रमाणपत्र मिळण्याबाबत अडचणी येत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. या अनुषंगाने मा. मंत्री (सा. न्या.) व मा. मंत्री (अल्पसंख्यांक विकास) यांच्या दि. १२ -८-२०१४ च्या बैठकीत झालेल्या निर्णयाप्रमाणे खालील कागदपत्रे / पुरावे सादर केल्यास विशेष मागास प्रवर्ग (अ) मधील मुस्लिम समाजास नियमानुसार जात प्रमाणपत्रे व जात वैधता प्रमाणपत्रे देण्याबाबत कार्यवाही करावी.

१) मुस्लिम समाजातील अनुसुचित जमाती, इतर मागासवर्ग, विमुक्त जाती व भटक्या जमाती तसेच विशेष मागासवर्ग मधील जात प्रमाणपत्र न दिल्याबाबतचे व त्याबाबत कोणताही लाभ/ फायदा घेतलेला नाही / घेणार नाही अशा आशयाचे शपथपत्र दाखल करणे आवश्यक आहे.

२) दिनांक १३-१०-१९६७ पुर्वी महाराष्ट्रातील रहिवाशी असल्याबद्दलचा स्वतंत्र पुरावा देणे आवश्यक आहे.

३) शासनाने ५० आडनावाच्या जमातीच्या यादीस विशेष मागासप्रवर्ग-अ म्हणून मान्यता दिलेली आहे. त्याप्रमाणे त्यांना जात प्रमाणपत्र देण्यात यावे.

४) शासनाने वेळोवेळी जात प्रमामपत्र मिळविण्यासाठी/ देण्यासाठी विहित केलेल्या कागदपत्राऐवजी मुस्लिम समाजातील व्यक्तींना संबंधित भागातील धार्मिक स्थळ / संस्था यांनी किंवा समाजाच्या नोंदणीकृत संस्थेने दिलेले प्रमाणपत्र ग्राह्य धरण्यात यावे.

५) संबंधित गावातील तलाठी, ग्रामसेवक यांनी संबंधित व्यक्तींच्या वास्तव्य व जाती संबंधी दिलेला दाखला ग्राह्य धरण्यात यावा याबाबत दक्षता समितीने गृह चौकशी करून निर्णय घ्यावा.

सोबत जोडलेल्या नमुन्यातील शपथपत्र सादर करणे आवश्यक आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१४०८३०११२७३१८६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramhari Dagdu Shinde

Digitally signed by Ramhari Dagdu Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ramhari Dagdu Shinde
Date: 2014.08.30 11:55:00 +05'30'

**(रा. द. शिंदे)**
**सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) खाजगी सचिव, मा. मुख्यमंत्री, मंत्रालय
२) खाजगी सचिव, मा. उपमुख्यमंत्री, मंत्रालय
३) खाजगी सचिव, मा. मंत्री ( सामाजिक न्याय), मंत्रालय
४) खाजगी सचिव, मा. मंत्री (महसुल ), मंत्रालय
५) खाजगी सचिव, मा. मंत्री (अल्पसंख्यांक ), मंत्रालय
६) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (अल्पसंख्यांक), मंत्रालय
७) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (सामान्य प्रशासन विभाग ), मंत्रालय
८) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री ( सामाजिक न्याय), मंत्रालय
९) विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई,
१०) विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
११) अप्पर मुख्य सचिव, सा.प्र. विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) अप्पर मुख्य सचिव, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) अप्पर मुख्य सचिव, अल्पसंख्यांक विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) सचिव (सा. वि. स. ), सा.प्र. विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) महालेखापाल, महाराष्ट्र- १, मुंबई,
१६) महालेखापाल, महाराष्ट्र- २,नागपूर,
१७) सर्व विभागीय आयुक्त,
१८) सर्व जिल्हाधिकारी,

१९) सर्व उप विभागीय दंडाधिकारी, (महसुल) तथा उप विभागीय अधिकारी,
२०) सर्व तालुका कार्यकारी दंडाधिकारी तथा तहसिलदार,
२१) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२२) महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
२३) संचालक, विजाभज, महाराष्ट्र राज्य, पुणे,.
२४) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, / सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
४७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२५) सर्व जिल्हा परिषदांचे समाजकल्याण अधिकारी,
२६) सर्व अध्यक्ष/सदस्य सचिव,विभागीय जात पडताळणी समिती क्रमांक १, २, ३
२७) महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय मुंबई,
२८) निवड नस्ती, का- मावक

92

# प्रतिज्ञापत्र/स्वघोषणापत्र

~~मि~~ मी _____________________ वय______ राहणार___________________

सत्य प्रतिज्ञनेवरून कथन करतो की ~~मि~~ मी वरील पत्यावर राहात असून महाराष्ट्रातील 13 ऑक्टोबर १९६७ पूर्वीपासूनचा कायम रहिवासी आहे.

~~मि~~ मी __________ या विषेश मागास परवर्गाच्या SBC (a) असून ~~मि~~ मी सदर जमातीच्या नावाने समाजात ओळखला जात आहे. माझी जात/जमात आडनावाने ओळखली जात आहे. त्यानुसार माझे आडनाव ________________ असून ~~मि~~ मी या समाजाच्या जात/जमाती च्या नोदणीकृत संघटना / ट्रस्ट चे प्रमाणपत्र / तलाठी / ग्रामसेवक यांचा दाखला सादर करत आहे.

मी ~~मि~~ घोषित करतो की ~~मि~~ मी ___________________ या जात/जमाती चा आहे. सदर प्रतिज्ञापत्र/ स्वघोषणापत्र मला स्वतःला /माझा मुलगा/मुलगी (नाव) _____________________ याला विषेश मागास प्रवर्गच्या SBC (a) जातीचे प्रमाणपत्र मिळण्याकामी करत आहे.

मी असे जाहीर करतो की, महाराष्ट्र शासनाने घोषित केलेल्या एस.टी./ ओबीसी/ विमुक्त जाती/ विमुक्त जमाती तसेच विषेश मागासवर्ग यादीतील जमातीचा /जातीचा नाही. मी असेही घोषित करतो की यापुर्वी मी या ओबीसी इ. जमातीचा/ जातीचा दाखला घेतलेला नाही व भविष्यातही घेणार नाही.

प्रतिज्ञापत्रातील/ स्वघोषणापत्रातील सर्व मजकूर सत्य व खरा आहे. मजकूर खोटा आढळून आल्यास भारतीय दंड संहिता (आयपीसी )कलम 193(2),199 व 200 नुसार शिक्षेस पात्र राहीन. हे प्रतीज्ञापत्र आज दि.------ ----------- रोजी लिहून दिले.

अर्जदाराची सही

